**राज्य शासकीय कर्मचा-यांना सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजना लागू करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**

**शासन निर्णय, क्रमांक: वेतन-११९९/प्र.क्र.२/९९/सेवा-३**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक २० जुलै २००१.**

**वाचा.**--(१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही-१०९५/प्र.क्र.१/९५/बारा, दिनांक ८ जून १९९५.
(२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही-१०९५/प्र.क्र.३३/९५/बारा, दिनांक १ नोव्हेंबर १९९५.
(३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही-१०९६/प्र.क्र.३३/९५/बारा, दिनांक २० मार्च, १९९७.
(४) केंद्र शासनाचे कार्यालयीन ज्ञापन क्रमांक ३५०३४/१/९७-इएसटीटी (ड) दिनांक ९ ऑगस्ट १९९९.

**<u>शासन निर्णय</u>**

संदर्भाधीन अनुक्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये गट "क" व "ड" (वर्ग ३ व ४ मधील) कर्मचा-यांना पदोन्नतीच्या संधी उपलब्ध नसल्याने असलेली कुंठीतता घालविण्यासंबंधीची (कालबध्द पदोन्नती) योजना दिनांक १ ऑक्टोबर १९९४ पासून अंमलात आलेली आहे. केंद्रीय वेतन आयोगाच्या शिफारशीनुसार राज्य शासकीय व इतकर कर्मचा-यांना दिनांक १ जानेवारी १९९६ पासून सुधारित वेतनश्रेणी विहित करण्याबाबत शिफारस करण्याकरिता श्री.द.म.सुकथनकर, सेवानिवृत्त मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन यांच्या अध्यक्षतेखाली "राज्य वेतन सुधारणा समिती, १९९७" नियुक्त करण्यात आली होती. या समितीने राज्य शासकीय कर्मचा-यांना सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजना लागू करण्याबाबत शिफारस केली होती. केंद्र शासनाने संदर्भाधिन अनुक्रमांक (४) येथील कार्यालयीन ज्ञापनान्वये केंद्र शासकीय कर्मचा-यांना सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजना लागू केली आहे. राज्य शासकीय कर्मचा-यांना "सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजना" लागू करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

२.		शासन आता असे आदेश देत आहे की संदर्भाधीन अनुक्रमांक (१) येथील शासन निर्णयान्वये अंमलात आलेली कालबध्द पदोन्नती योजना बंद करुन त्याऐवजी "सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजना" लागू करण्यात यावी. ही योजना पुढीलप्रमाणे अंमलात येईल.

(१) ही योजना रु.८०००-१३५०० व त्याहून कमी वेतनश्रेणीत वेतन घेणा-या अधिकारी/कर्मचा-यांना लागू होईल.

(२) या योजनेचा लाभ संबंधीत पदावरील १२ वर्षाच्या नियमित सेवेनंतरच अनुज्ञेय होईल.

(३) सेवेत दोन किंवा त्याहून अधिक वेळा पदोन्नती मिळालेल्या कर्मचा-यांना या योजनेचा लाभ अनुज्ञेय होणार नाही.

(४) या योजनेअंतर्गत पदोन्नतीच्या पदाची वेतनश्रेणी देय होईल. जेथे पदोन्नतीचे पद उपलब्ध नाही तेथे तसेच एकाकी (Isolated) पदावरील कर्मचा-यांना या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट-एक मधील वेतनश्रेणी देय होईल.

(५) या योजनअंतर्गत पदोन्नतीच्या पदाची वेतनश्रेणी देय ठरविली असल्याने वरिष्ठ वेतनश्रेणी मिळण्यासाठी पदोन्नतीच्या पदाकरिता विहित केंलेली अर्हता, पात्रता, ज्यष्ठता, अर्हता परिक्षा, विभागीय परिक्षा या सर्व बाबींची पूर्तता करणे तसेच पदोन्नतीची कार्यपध्दती अनुसरणे आवश्यक राहील. जेथे या शासन निर्णयासोबतच्यश परिशिष्टातील वेतनश्रेणी मंजूर करण्यात येईल तेथे गोपनीय अहवालाच्या आधारे पात्रता तपासण्यात यावी.

(६) या योजनेचा लाभ संपूर्ण सेवेत फक्त एकवेळ अनुज्ञेय राहील. ज्या कर्मचा-यांना दिनांक ८ जून १९९५ च्या शासन निर्णयान्वये यापूर्वीच वरिष्ठ वेतनश्रेणीचा लाभ मिळाला असेल त्यांना या योजनेअंतर्गत पुन्हा वरिष्ठ वेतनश्रेणीचा लाभ अनुज्ञेय होणार नाही.

(७) या योजने अंतर्गत वरिष्ठ वेतनश्रेणी दिल्यावर वेतननिश्चिती नियमित पदोन्नतीप्रमाणेच होईल. मात्र त्याच वेतनश्रेणीत नियमित/कार्यात्मक पदोन्नती मिळाल्यावर पुन्हा वेतननिश्चितीचा लाभ देय होणार नाही

(८) नियमित पदोन्नती नाकारलेल्या तसेच नियमित पदोन्नतीस अपात्र ठरलेल्या कर्मचा-यांना या योजनेचा लाभ देय होणार नाही. या योजनेअंतर्गत वरिष्ठ वेतनश्रेणी दिल्यानंतर नियमित पदोन्नती नाकारलेल्या वा नियमित पदोन्नतीस अपात्र ठरलेल्या कर्मचा-यांना देण्यात आलेला लाभ काढून घेण्यात येईल. मात्र दिलेल्या लाभांची वसूली करण्यात येणार नाही.

३.		या योजनेसंबंधीची अन्य मार्गदर्शक तत्वे वरील अनुक्रमांक (१) ते (३) येथील आदेशामध्ये नमूद केल्याप्रमाणे राहतील.

४. विद्यमान योजनेअंतर्गत ज्या पात्र कर्मचा-यांना यापूर्वी वरील अनुक्रमांक (१) येथील दिनांक ८ जून १९९५ च्या आदेशाच्या परिच्छेद २ (ड) मधील तरतूदीअन्वये यथास्थिती पदोन्नतीच्या पदाची किंवा सदर शासन निर्णयासोबतच्या परिशिष्टातील वेतनश्रेणी अनुज्ञेय करण्यात आली असेल त्यांना दिलेला लाभ यापुढेही तसाच चालू राहील. सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेअंतर्गत मात्र आता अराजपत्रित कर्मचा-यांनादेखील यापुढे वरील परिच्छेद २ (३) मधील तरतूदीनुसारच हा लाभ देय होईल.

५. ही योजना दिनांक १ ऑगस्ट २००१ पासून अंमलात येईल.

६. ही योजना जिल्हा परिषद कर्मचा-यांना लागू राहील.

७. हे आदेश सामान्य प्रशासन विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**श.वि.लागवणकर,**
शासनाचे सहसचिव.

प्रति,

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१ महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)- २महाराष्ट्र, नागपूर,
महालेखापाल (लेखापरीक्षा)-१ महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल (लेखापरीक्षा)-२ महाराष्ट्र, नागपूर,
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.(१० प्रती)
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई. (१० प्रती)
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
राज्यपालांचे सचिव.
मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
उप मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,
मुख्य सचिवांचे उप सचिव, (७० प्रती)
संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय (५०० प्रती)
मंत्रालयीन सर्व विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,

मंत्रालयाच्या सर्व विभागाच्या अधिपत्याखालील विभाग प्रमुख, प्रादेशिक प्रमुख व कार्यालय प्रमुख.,
*प्रबंधक, उच्च न्यायालय, (मूळ शाखा), मुंबई,
*प्रबंधक उच्च न्यायालय, (अपील शाखा), मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
*प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
*प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधीकरण, कुटीर क्रमांक ३ व ४,
अधिदान व लेखा कार्यालय, आवार, मंत्रालयासमोर, मुंबई.
सिनीयर रिसर्च ऑफिसर, पे रिसर्च युनिट, भारत सरकार, वित्त मंत्रालय (व्यय विभाग)
खोली क्र.२६१, नॉर्थ ब्लॉक, नवी दिल्ली,
विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदर, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली,
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई,
उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती,
वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक
जनसंपर्क अधिकारी, मंत्रालय, मुंबई,
सर्व जिल्हा परिषषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
वित्त विभागातील सर्व कार्यासने,
निवडनस्ती, सेवा-३, वित्त विभाग.

--------

*पत्राने

## परिशिष्ट-एक
## शासन निर्णय, क्रमांक-वेतन ११९९/प्र.क्र.२/९९/सेवा-३
## दिनांक २० जुलै २००१ सोबतचे परिशिष्ट एक
## सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेंतर्गत अनुज्ञेय होणारी वेतनश्रेणी

| अनु क्रमांक | विद्यमान सुधारित वेतनश्रेणी (रुपये) | अनुज्ञेय सुधारित वेतनश्रेणी (रुपये) |
|---|---|---|
| १. | २५५०-५५-२६६०-६०-३२०० | २६१०-६०-२९१०-६५-३३००-७०-४००० |
| २. | २६१०-६०-२९१०-६५-३३००-७०-४००० | २६५०-६५-३३००-७०-४००० |
| ३. | २६५०-६५-३३००-७०-४००० | २७५०-७०-३८००-७५-४४०० |
| ४. | २६५०-७-३८००-७५-४४०० | ३०५०-७५-३९५०-८०-४५९० |
| ५. | ३०५०-७५-३९५०-८०-४५९० | ३२००-८५-४९०० |
| ६. | ३२००-८५-४९०० | ४०००-१००-६००० |
| ७. | ४०००-१००-६००० | ४५००-१२५-७००० |
| ८. | ४५००-१२५-७००० | ५०००-१५०-८००० |
| ९. | ५०००-१५०-८००० | ५५००-१७५-९००० |
| १० | ५५००-१७५-९००० | ६५००-२००-१०५०० |
| ११. | ६५००-२००-१०५०० | ७४५०-२२५-११५०० |
| १२. | ७४५०-२२५-११५०० | ७५००-२५०-१२००० |
| १३. | ७५००-२५०-१२००० | ८०००-२७५-१३५०० |
| १४. | ८०००-२७५-१३५०० | १००००-३२५-१५२००० |